**<u>लोकसभा सार्वत्रिक निवडणूक २०२४</u>**
**निवडणूक संबंधीत राज्य, जिल्हा व तहसिल स्तरावरील राजपत्रित अधिकाऱ्यांना पारिश्रमिक/ मानधन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सीईएल-२०२४/प्र.क्र.६२५/२४/३३(१),**
मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ जुलै, २०२४

**<u>शासन निर्णय -</u>**

महाराष्ट्र राज्यात दिनांक १९ व २६ एप्रिल २०२४ व ७, १३ व २० मे, २०२४ अशा पाच टप्यात लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ घेण्यात आली आहे. दिनांक १६ मार्च, २०२४ रोजी लोकसभा सार्वत्रिक निवडणूकीचा कार्यक्रम घोषित केल्यापासून ते दिनांक ०६ जून, २०२४ ह्या निवडणूकीची प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीमध्ये निवडणूकीच्या कामाशी प्रत्यक्ष संबंधित असलेल्या राज्य, जिल्हा व तहसिल स्तरावरील राजपत्रित अधिकाऱ्यांना ह्या निवडणूकीसंबंधातील समय मर्यादेत संवेदनशील, जिकीरीचे दगदगीचे काम अत्यंत परिश्रमपूर्वक व जबाबदारीने पार पाडावे लागले. ह्या निवडणूकीत संबंधित अधिकाऱ्यांवर पडणारा कामाचा ताण, कामाची व्याप्ती व कामाचे दिवस इत्यादी लक्षात घेऊन खाली नमूद केलेल्या राज्य, जिल्हा व तहसिल स्तरावरील निवडणूकीच्या कामासंबंधीत राजपत्रित अधिकाऱ्यांना त्यांच्या माहे एप्रिल-२०२४ ह्या महिन्यातील अनुज्ञेय मूळ वेतन (Basic Pay) एवढी रक्कम पारिश्रमिक/ मानधन म्हणून देण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. परंतु कोणत्याही अधिकाऱ्यांची अशी रक्कम त्याच्या १ महिन्याच्या मूळ वेतनापेक्षा जास्त असणार नाही. तसेच सदर मानधन हे एका अधिकाऱ्यास एकदाच देय होईल.

**(अ) राज्यस्तर :-**

१. मुख्य सचिव
२. अपर मुख्य सचिव (गृह)
३. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग
४. मुख्य निवडणूक अधिकारी
५. सह सचिव व अतिरिक्त मुख्य निवडणूक अधिकारी
६. राज्य सूचना विज्ञान अधिकारी, महाराष्ट्र राज्य
७. मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या कार्यालयातील राजपत्रित अधिकारी
८. मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या कार्यालयात प्रत्यक्ष निवडणूकीच्या कामाकरिता ज्यांच्या सेवा उपलब्ध करून घेण्यात आल्या आहेत असे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील राजपत्रित अधिकारी
९. मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या कार्यालयात प्रत्यक्ष निवडणूकीच्या कामाकरिता ज्यांच्या सेवा उपलब्ध करून घेण्यात आल्या आहेत असे राष्ट्रीय सूचना केंद्रातील (NIC) राजपत्रित अधिकारी
१०. मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या कार्यालयासाठी सामान्य प्रशासन विभागाने अधिग्रहीत करुन ज्यांच्या सेवा उपलब्ध करुन दिल्या आहेत असे राजपत्रित अधिकारी
११. निवडणुकीच्या कामासाठी कार्यरत शासन मुद्रण व लेखन सामुग्री संचालनालय, चर्नी रोड, मुंबई व शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नीरोड, मुंबई यांचे कार्यालयातील राजपत्रित अधिकारी

**(ब) विभागीय व जिल्हास्तरीय :-**

१. सर्व विभागीय आयुक्त

२. सहायक आयुक्त/ उप आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (फक्त निवडणूकीचे काम करणारे)

३. सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी

४. सर्व निवडणूक निर्णय अधिकारी (लोकसभा मतदारसंघनिहाय)

५. सर्व लोकसभा मतदारसंघाचे सहायक निवडणूक निर्णय अधिकारी

६. सर्व जिल्ह्याचे उप जिल्हा निवडणूक अधिकारी

७. सर्व तहसिलदार (फक्त निवडणुकीचे काम करणारे)

८. नायब तहसिलदार (प्रत्यक्षात निवडणूक कामकाज केलेले)

९. जिल्हा निवडणूक अधिकाऱ्यांचे स्वीय सहायक/ चिटणीस/ हेडक्लार्क (जे राजपत्रित अधिकारी असतील व त्यांनी या निवडणुकीचे काम केले आहे)

१०. या व्यतिरिक्त जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांनी लोकसभा निवडणूक २०२४ च्या प्रत्यक्ष कामासाठी निवडणूकीच्या संपूर्ण कालावधीकरिता स्वत: लेखी आदेश काढून नियुक्त केलेले इतर राजपत्रित अधिकारी

२. या बाबींवर होणारा खर्च **"मागणी क्रमांक ए-२, प्रधानशीर्ष २०१५-निवडणूका, उपशीर्ष १०५-संसदेच्या निवडणूक घेण्यासाठी लागणारा खर्च, (००)(०१) संसदेच्या निवडणूक घेण्यासाठी लागणारा खर्च, १३-कार्यालयीन खर्च, (२०१५००५९) दत्तमत"** या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक ११४/सेवा-६/२०२४, दि.२४.०६.२०२४ तसेच अनौ. संदर्भ क्रमांक ३८४/व्यय-४/२०२४, दि.२४.०६.२०२४अन्वये दिलेल्या सहमतीनंतर निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०११६०६२६८००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YOGESH MAHADEO GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea54667614a049c47985d83, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E85F3D06BECDD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2024.07.01 16:17:27 +05'30'

**( योगेश गोसावी )**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र -१ मुंबई

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), नागपूर

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे

४. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

६. अपर मुख्य सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

७. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. अतिरिक्त मुख्य निवडणूक अधिकारी, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त
१० सहायक आयुक्त/ उप आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (निवडणूकीचे काम करणारे)
११. सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी
यांना सूचित करण्यात येते की, सदरची रक्कम संक्षिप्त देयकावर काढता येणार नसल्यामुळे त्यांनी कोषागारात तपशिलवार देयक सादर करुन सदर रक्कम खर्ची टाकण्यात यावी.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. * सर्व लोकसभा मतदारसंघाचे निवडणूक निर्णय अधिकारी
१५. * सर्व लोकसभा मतदारसंघाचे सहायक निवडणूक निर्णय अधिकारी
१६. * सर्व जिल्ह्याचे उप जिल्हा निवडणूक अधिकारी
१७. वित्त विभाग सेवा -६ / व्यय-४, मंत्रालय, मुंबई
१८. सामान्य प्रशासन विभाग/ का.क्र.२६, मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती (कार्यासन - ३३)
(* जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांचेमार्फत)